**विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग च्या युवक व युवतींकरीता मोटार वाहन चालक व वाहक प्रशिक्षण योजना राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : मोवाप्र-२०१८/प्र.क्र.९३/विजाभज-१**

विस्तार भवन, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-३२

दिनांक : ११ ऑक्टोबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

राज्यातील वाहनांची वाढणारी संख्या, वाहतूक व्यवस्था, रस्ते व दिवसेंदिवस लोकांचा पर्यटनाकडे वाढणारा कल लक्षात घेता, वाहन व्यवसायामध्ये रोजगाराची मोठया प्रमाणात संधी निर्माण होत आहे. तथापि, विजाभज, इमाव व विमाप्र समाजामध्ये शिक्षणाचे प्रमाण कमी असून त्याबरोबरच बेरोजगारीचे प्रमाण सुध्दा जास्त आहे. हे पाहता या बेरोजगारांना रोजगाराच्या संधी उपलब्ध व्हाव्यात व त्यांना कौशल्यपूर्ण प्रशिक्षण मिळावे, जेणेकरुन त्यांना शाश्वत रोजगाराचे साधन उपलब्ध होऊन त्यांना स्थिर जीवन जगता यावे यासाठी विजाभज, इमाव व विमाप्र मधील युवक युवतींसाठी मोटार वाहन चालक व वाहक प्रशिक्षण देणे आवश्यक आहे.

उपरोक्त बाबी विचारात घेता विजाभज, इमाव व विमाप्र मधील युवक युवतींकरिता विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण या विभागामार्फत मोटार वाहन चालक व वाहक प्रशिक्षण योजना राबविण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग यातील उमेदवारांना मोटार वाहन चालक व वाहक प्रशिक्षण योजना राबविण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू योजनेच्या अटी व शर्ती, लाभार्थी निवडीचे निकष, अर्जाचा नमूना, बंधपत्र, करारनामा व इतर कागदपत्र इ. बाबी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ”, "ब”, "क”, "ड" आणि "इ" प्रमाणे राहतील.

३. सदरहू योजना राबविण्यासाठी राज्यस्तरावर ई-निविदा प्रसिध्द करणे व तद्नुषंगिक पुढील सर्व कार्यवाही संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचे स्तरावरुन करण्यात यावी.

४. सदर योजना राबवितांना ई-निविदेद्वारे प्रत्येक प्रादेशिक विभाग स्तरावर एका संस्थेची निवड करुन त्या संस्थेमार्फत सदरहू योजना राबविण्याची कार्यवाही करावी.

५. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचे स्तरावरुन ई-निविदा प्रसिध्द करण्यासाठीचे विहित नमुन्याचे प्रपत्र "अ”, "ब”, "क”, "ड”, "इ" व "ई" सोबत जोडले आहेत.

६. या योजनेंतर्गत प्रशिक्षण देण्यासाठी संस्थांची निवड ई-निविदा प्रक्रियेद्वारे करण्यात येईल. ई-निविदा प्रसिध्द करणे, ई-निविदा उघडणे, तांत्रिक बाबींची शहानिशा करणे व पात्र निविदा धारकांची माहिती संकलित करुन व तुलनात्मक तक्ता तयार करुन शासनास सादर करण्यासाठी संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

७. प्रशिक्षणासाठी प्रशिक्षण संस्थांची अंतीम निवड करण्याचे अधिकार शासनाचे राहतील.

८. यासाठी सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

९. या योजनेवर होणारा खर्च लेखाशिर्ष “२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अपल्पसंख्यांक यांचे कल्याण, १०२-आर्थिक विकास, (०१) विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग यांचे कल्याण, (०१)(०१) संगणक, वाहन चालन, सैन्य व पोलीस भरती पूर्व प्रशिक्षण आणि राज्य केंद्र सरकारच्या स्पर्धा परीक्षा प्रशिक्षण (२२२५ई८०१) (कार्यक्रम) (दत्तमत) (मागणी क्र.झेडजी-३)” याखाली टाकण्यात येऊन मंजूर तरतदीमधून भागविण्यात यावा.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१२१७२१४९७९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: CN = Bhaurao Raghunath Gavit, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = VJNT OBCS SBC Welfare Dept.
Date: 2018.10.12 17:26:23 +05'30'

**( भा. र. गावित )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
४) मा. विधान परिषद/विधानसभा सदस्य (सर्व), विधानमंडळ, मुंबई.
५) मा.मंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र यांचे खाजगी सचिव.
६) मा.राज्यमंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र यांचे खाजगी सचिव.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे.
९) व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती, भटक्या जमाती विकास महामंडळ (म.), मुंबई.
१०) व्यवस्थापकीय संचालक, इतर मागासवर्गीय वित्त विकास महामंडळ (म.), मुंबई.
११) सर्व प्रादेशिक उपआयुक्त, समाज कल्याण विभाग.
१२) सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण.
१३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१४) सह सचिव/उपसचिव/कक्ष अधिकारी (सर्व), विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग.
१५) स्वीय सहाय्यक, सचिव (विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग), मंत्रालय,मुंबई.
१६) निवडनस्ती (विजाभज-२)

(शासन निर्णय विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग क्रमांक मोवाप्र-२०१८/प्र.क्र.९३/विजाभज-१, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८ चे सहपत्र)

# मोटार वाहन चालक प्रशिक्षण योजना

## योजनेचा सुधारीत प्रस्ताव

## परिशिष्ट-अ

## विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील बेरोजगार युवक-युवतींसाठी मोटार वाहन चालक प्रशिक्षण योजना.

## नियमावली.

*****

(१) सदरची योजना राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये राबविण्यात येईल.

(२) केंद्र शासन,राज्य शासन व महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळा मार्फत चालविण्यात येणाऱ्या वाहन चालक प्रशिक्षण संस्था, तसेच मोटार वाहन विभागाने प्राधिकृत केलेल्या प्रशिक्षण देणारी संस्था ही मोटार वाहन अधिनियमांतर्गत नमूद, सर्व मुलभूत सोयींनी युक्त असावी.

(३) प्रशिक्षण हे केंद्रीय मोटर वाहन कायदा व त्या अंतर्गत करण्यात आलेले नियम, तसेच महाराष्ट्र मोटार वाहन कायदा व त्या अंतर्गत करण्यात आलेले नियम या मधील तरतूदी नुसार राहील.

(४) सदरील प्रशिक्षण हे खालील परवान्यासाठी राहील.

| अ. क्र. | प्रशिक्षणाचा तपशिल | शैक्षणिक पात्रता | वयोमर्यादा | प्रशिक्षणाचा कालावधी | प्रशिक्षणाचे स्वरुप | इतर अटी | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | लाईट मोटार व्हेईकल (LMV) नॉन ट्रान्सपोर्ट | किमान ८ वी पास चांगली दृष्टी असणे आवश्यक. | किमान १८ वर्षे पूर्ण | जास्तीत जास्त ३० दिवस | अनिवासी | ---- | |
| २ | हेवी मोटार व्हेईकल (HMV) | किमान ८वी पास चांगली दृष्टी असणे आवश्यक. | किमान २० वर्षे पूर्ण | जास्तीत जास्त ३० दिवस | अनिवासी | किमान १ वर्ष LMV ट्रान्सपोर्ट लायसन्स धारण केलेले असावे. | |

(५) प्रशिक्षण देणाऱ्या संस्थांची निवड ई-निविदेव्दारे शासन स्तरावरुन करण्यात येईल. तथापी, प्रशिक्षण

देणारी संस्था जर केंद्र व राज्य शासनामार्फत किंवा महामंडळा मार्फत चालविली जात असेल, तर त्यांनी नमूद केलेले दराबाबत वाटाघाटी करण्यात येतील. त्यानंतर अंतिम दर ठरविण्यात येईल.

(६) **प्रशिक्षण** - प्रशिक्षण देणाऱ्या संस्थेस प्रती विद्यार्थी निविदेमध्ये अंतिम केलेल्या दराप्रमाणे खर्चाची प्रतिपूर्ती सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांचेकडून करण्यात येईल. यामध्ये मोटार वाहन प्रशिक्षण, मोटार वाहन प्रात्यक्षिक, सिमूलेटर ट्रेनिंग, वर्कशॉप ट्रेनिंग, वैद्यकीय चाचणी, कच्चे व पक्के लायसन्स, फोटो इ. बाबींचा समावेश राहील.

(७) प्रत्येक उमेदवाराचा दैनिक हजेरीपट ठेवण्यात यावा.

(८) प्रशिक्षण पूर्ण केलेल्या उमेदवारांना संस्थेने वाहन चालक परवाना मिळवून देणे बंधनकारक राहील.

(९) यशस्वीरित्या प्रशिक्षण पूर्ण केलेल्या उमेदवारांची यादी आवश्यक त्या माहितीसह विहीत नमुन्यात तयार करुन संबंधीत, सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांचेकडे प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर १० दिवसांच्या आत सादर करावी.

(१०) प्रशिक्षण कालावधीत प्रशिक्षणार्थींना दैनंदिन खर्च भागविण्यासाठी एकूण रु.१,२००/- विद्यावेतन म्हणून देय राहील. सदरची रक्कम प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर व वाहन चालक परवाना प्राप्त झाल्यानंतर सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण हे प्रशिक्षणार्थींच्या बँक खात्यावर परस्पर वर्ग करतील.

(११) प्रशिक्षण पूर्ण केलेल्या प्रशिक्षणार्थींची यादी संबंधीत संस्था, संबंधीत सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांनी अद्ययावत ठेवावी व त्याची एक प्रत संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांना प्रशिक्षण पूर्ण झाल्यापासून ३० दिवसांच्या आत पाठवावी.

(१२) प्रशिक्षणासाठी क्षेत्रनिहाय नमूद केलेले भौतिक उद्दिष्टे शासन स्तरावरुन निश्चित करुन सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांना देण्यात येईल. त्यानुसार संबंधीत सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांनी लाभार्थी निवड समिती मार्फत प्रशिक्षणार्थींची निवड करणे. निवड केलेल्या प्रशिक्षणार्थींची यादी संस्थेला उपलब्ध करुन देण्यात यावी.

(१३) निवड झालेल्या प्रशिक्षण संस्थेबरोबर सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांनी आवश्यक तो करारनामा करुन घ्यावा.

(१४) निवड करण्यात आलेल्या प्रशिक्षणार्थीकडून विहीत नमून्यातील बंधपत्र सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांनी करुन घ्यावे.

**(शासन निर्णय विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग क्रमांक मोवाप्र-२०१८/प्र.क्र.९३/विजाभज-१, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८ चे सहपत्र)**

**परिशिष्ट- ब**

**मोटार वाहन चालक प्रशिक्षण योजना लाभार्थी निवडीचे निकष**

(१) अर्जदार हा महाराष्ट्र राज्याचा कायमस्वरुपी रहिवासी असावा.

(२) अर्जदार हा विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील असावा.

(३) अर्जदाराचे वय जाहिरात प्रसिध्द केल्याच्या दिनांकास हलके वाहन चालक परवाना करीता वय १८ वर्षे पुर्ण, तर जड वाहन चालक परवाना करीता वय २० वर्षे पूर्ण असावे. वरील दोन्ही परवान्यांसाठी अर्जदाराची कमाल वयोमर्यादा ३५ वर्षे राहील.

(४) ज्या उमेदवारास जड वाहन परवाना प्रशिक्षण घ्यावयाचे आहे, त्याचेकडे हलके मोटार वाहन परवाना (ट्रान्सपोर्ट) १ वर्षे पूर्ण झालेले असणे आवश्यक आहे.

(५) अर्जदार हा किमान इयत्ता ८ वी उत्तीर्ण व बेरोजगार असावा.

(६) अर्जदाराचे वास्तव्य हे संबंधीत जिल्ह्यातील असणे बंधनकारक आहे. त्यासाठी वास्तव्याच्या ठिकाणचे पालक /स्वतःच्या नावावरील रेशनकार्ड/विद्युत देयक/आधारकार्ड इत्यादी कागदपत्रे सादर करणे बंधनकारक आहे.

(७) अर्जदाराच्या वडिलांचे सर्व मार्गांनी मिळणारे वार्षिक उत्पन्न रु.१.०० लाख पेक्षा जास्त नसावे. त्या पुष्टर्थ सक्षम प्राधिकारी (तहसिलदार) यांचा उत्पन्नाचा दाखला सादर करण्यात यावा.

(८) अर्जदार हा विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील असल्याबाबत जातीचे विहीत प्रमाणपत्र दाखल करणे बंधनकारक राहील.

(९) एकूण उद्दिष्टांपैकी हलके मोटार वाहन प्रशिक्षणासाठी ३०% जागा महिलांसाठी आरक्षित राहतील. तथापी, महिला प्रशिक्षणार्थींचे अर्ज कमी प्रमाणात प्राप्त झाल्यास रिक्त जागा पुरुष उमेदवारांमधून भरण्यात येतील. तथापि, यासाठी लाभार्थी निवड समितीच्या अध्यक्षांची पूर्वपरवानगी घेण्यात यावी.

(१०) अर्जदार उमेदवार हे मोटार परिवहन अधिनियम तरतूदीनुसार शारिरीक व वैद्यकीयदृष्ट्या पात्र असावा. तसे प्रमाणपत्र सादर करावे.

(११) अर्जदार यांनी यापूर्वी या योजनेचा लाभ घेतलेला नसावा.

(१२) अर्जदाराकडे हलके मोटार वाहनचालक परवाना (Licence) असल्यास, असे अर्जदार या योजनेत जड वाहन परवान्याखेरीज लाभ घेण्यास पात्र राहणार नाहीत.

(१३) लाभार्थ्यांची निवड करण्यासाठी खालील प्रमाणे समितीचे गठन करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण (संबंधीत) | **-अध्यक्ष** |
| २) प्रादेशिक /जिल्हा परिवहन कार्यालयातील मोटार वाहन निरिक्षक/प्रतिनिधी | **- सदस्य** |
| ३) सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण (संबंधीत) | **- सदस्य सचिव** |

(१४) सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांनी स्थानिक वर्तमानपत्रात जाहीर प्रसिध्दीस, देऊन इच्छूक उमेदवारांचे विहीत नमून्यात अर्ज मागवावेत. प्राप्त अर्जांची दिनांकनिहाय विहीत नमुन्यातील वहीमध्ये नोंद करण्यात यावी.

त्या अनुषंगाने खालील प्रमाणे कार्यवाही करावी.

**अ)** प्राप्त झालेल्या अर्जांची लाभार्थी निवड समितीद्वारे छाननी करण्यात यावी व पात्र लाभार्थ्यांची यादी तयार करण्यात यावी.

**ब)** शासनाकडून जिल्हानिहाय उद्दिष्टे प्राप्त झाल्यानंतर, त्यानुसार पात्र लाभार्थ्यांमधून प्रशिक्षणासाठी लाभार्थ्यांची निवड लॉटरी पध्दतीने करुन त्याची यादी व प्रतिक्षा यादी तयार करण्यात यावी व सदरची यादी सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांचेमार्फत संबंधीत प्रशिक्षण संस्थेस देण्यात यावी.

**क)** निवड समितीने तयार केलेली निवड यादी व प्रतिक्षा यादी सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांचे स्वाक्षरीने संबंधीत संस्थेस देण्यात यावी. निवड यादीतील उमेदवार विहीत मुदतीत हजर न झाल्यास प्रतिक्षा यादीतील उमेदवारांना अनुक्रमांकानुसार प्रशिक्षणासाठी बोलविण्यात यावे.

**ड)** संबंधीत प्रशिक्षण संस्थेने निवड यादी प्राप्त झाल्यानंतर प्रशिक्षणासाठी हजर राहणेसाठी लाभार्थ्यांना हस्ते पोहच देय डाकेने कळविण्यात यावे.तसेच त्याच्या भ्रमणध्वनीवर एसएमएस वर कळविण्यात यावे. (यासाठी वेगळा खर्च देय होणार नाही.)

**इ)** प्रशिक्षण सत्रासाठी हजर झालेल्या लाभार्थ्याकडून आवश्यक ते बंधपत्र रु. १००/- चे स्टँप पेपरवर करुन घेणे, तसेच इतर अटींची पुर्तता प्रशिक्षण संस्थेने करुन घ्यावी.

**ई)** संबंधीत संस्थेने निवड यादीतील लाभार्थ्यांची प्रथमत: वैद्यकीय तपासणी जिल्हा सामान्य रुग्णालय / ग्रामीण रुग्णालय, महानगरपालिका व नगरपालिकेच्या रुग्णालयामध्ये करण्यात यावी व त्यामध्ये वैद्यकीयदृष्ट्या पात्र ठरणाऱ्या उमेदवारांनाच प्रशिक्षण सत्रासाठी रुजू करुन घ्यावे.

**(१५)** अर्जदाराची प्रशिक्षणासाठी निवड झाल्यानंतर मध्येच प्रशिक्षण सोडता येणार नाही, तसे केल्यास झालेला खर्च उमेदवारांकडून वसूलपात्र राहील. व तसे बंधपत्र प्रशिक्षणार्थीकडून घेणे बंधनकारक राहील.

*****

**(शासन निर्णय विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग क्रमांक मोवाप्र-२०१८/प्र.क्र.९३/विजाभज-१, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८ चे सहपत्र)**

## विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील बेरोजगार युवक-युवतींना मोटार वाहन चालक प्रशिक्षण योजना

### परिशिष्ट-क
### उमेदवाराकडून भरुन घ्यावयाचा अर्जाचा विहित नमुना

प्रति,
मा.सहाय्यक आयुक्त,
समाज कल्याण -------

| उमेदवाराचा पासपोर्ट साईजचा रंगीत फोटो |
|---|

| | | |
|---|---|---|
| १. | उमेदवाराचे संपूर्ण नांव | :श्री/श्रीमती------------------------------------ |
| २. | उमेदवाराचा भ्रमणध्वनी क्रमांक | :------------------------------------------------- |
| ३. | उमेदवाराचा ई-मेल आयडी | :------------------------------------------------ |
| ४. | उमेदवाराचा आधार कार्ड क्रमांक | ------------------------------------------------ |
| ५. | उमेदवाराचे लिंग | : पुरुष / स्त्री |
| ६. | उमेदवाराची जात | :----------------------------------------------- |
| ७. | उमेदवाराच्या जातीचा प्रवर्ग | :**विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग** |
| ८. | उमेदवाराच्या जातीप्रमाणपत्राचा तपशिल. | :जातीचा प्रमाणपत्र देणाऱ्या अधिकाऱ्याचे पदनाम : उपविभागीय अधिकारी------------------------------<br>जिल्हा :------------------------------------------<br>प्रमाणपत्राचा क्रमांक व दिनांक----------------------- |
| ९. | उमेदवाराची जन्मतारीख | : / / |
| १०. | जाहिरात दिनांकास असलेले वय | वर्ष-------------------------------------- |
| ११. | उमेदवाराचा संपूर्ण पत्ता | :-------------------------------------------------<br>-------------------------------------------------<br>जिल्हा------------------------------------<br>पिनकोड---------------------------------- |
| १२. | उमेदवाराची शैक्षणिक पात्रता : | : इ. ८वी / १० वी / १२ वी/ पदविका/पदवी/पदव्युत्तर तपशिल------------------------------- |
| १३. | उमेदवाराच्या कुटूंबाचे वार्षिक उत्पन्न रक्कम | :रु.------------------------------------------ |

१४. उत्पन्नाच्या दाखल्याचा तपशिल : दाखला देणाऱ्या अधिकाऱ्याचे पदनाम-
तहसिलदार--------------------------------
जिल्हा---------------------------------
दाखल्याचा क्रमांक व दिनांक------------------
------------------------------------

१५. उमेदवाराची उंची : फुट ------------ इंच--------------------
१६. उमेदवाराचे वजन : कि.ग्रॅ.-------------------------------------
१७. उमेदवाराच्या बँक खात्याचा तपशिल : बॅकेचे नांव :------------------------------
शाखा:-----------------------------------
खाते क्रमांक------------------------------
आयएफएससी कोड--------------------
१८. यापूर्वी या योजनेचा लाभ घेतला आहे किंवा कसे? : होय / नाही
१९. अर्जासोबत पुढील प्रमाणपत्रांच्या सत्यप्रती जोडव्यात.

| | | |
|---|---|---|
| (१) उमेदवाराचा शाळा सोडल्याचा दाखला | : | होय / नाही |
| (२)उमेदवाराचे आधार कार्ड | : | होय / नाही |
| (३) उमेदवाराचे जातीचे प्रमाणपत्र | : | होय / नाही |
| (४) उत्पन्नाचा दाखला | : | होय / नाही |
| (५) रेशन कार्ड | : | होय / नाही |
| (६) उमेदवाराचा पासपोर्ट आकाराचा रंगीत फोटो | : | होय /नाही |

१) अर्जात नमूद केलेली माहिती ही माझ्या माहितीप्रमाणे खरी आहे. त्यामध्ये चुक आढळल्यास त्यास मी जबाबदार राहील.

२) मी असे नमूद करतो की, मी एक बरोजगार तरुण असून माझ्याकडे वाहनचालकाचा परवाना नाही, तसेच मी अन्य कोणत्याही ठिकाणी नोकरी करत नाही.

३) प्रशिक्षणासाठी माझी निवड झाल्यास, मी प्रशिक्षण अर्धवट सोडणार नाही, व त्यापोटी झालेला खर्च माझ्याकडून वसूलपात्र राहील, तसे मी रु. १००/- चे स्टँप पेपरवर बंधपत्र देईन.

**ठिकाण :** **उमेदवाराचे नांव व स्वाक्षरी**

**दिनांक / /**२०

**( शासन निर्णय विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग क्रमांक मोवाप्र-२०१८/प्र.क्र.९३/विजाभज-१, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८ चे सहपत्र)**

**विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील बेरोजगार युवक-युवतींना मोटार वाहन चालक प्रशिक्षण योजना**

**परिशिष्ट - ड**

**करारनामा**

विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील बेरोजगार युवकांना स्वयंरोजगार /व्यवसायाच्या संधी उपलब्ध व्हाव्यात, तसेच त्यांना तांत्रिक कौशल्य प्राप्त व्हावे, या उद्देशाने शासनाने मोटार वाहन चालक प्रशिक्षण योजना सुरु केलेली आहे. प्रशिक्षणासाठी निवड केलेल्या लाभार्थ्यांना वाहन चालविण्याचे प्रशिक्षण देण्यासाठी निवड केलेल्या संस्थेबरोबर करावयाचा करारनामा :

(श्री.--------------------)
संचालक,
विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण,
महाराष्ट्र राज्य, पुणे

लिहून घेणार

महाराष्ट्र राज्य, पुणे

श्री.----------------------
-------------------------
------------------------

लिहून देणार

विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील युवक-युवतींना स्वयंरोजगाराच्या संधी उपलब्ध व्हाव्यात, म्हणून मोटार वाहन चालक प्रशिक्षण योजना शासनाने सुरु केलेली असून शासनाचे आदेश क्र.--------------- दिनांक / /२० प्रमाणे प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण देण्यासाठी आमच्या संस्थेची निवड करण्यात आली आहे, म्हणून खालील प्रमाणे करारनामा करण्यात येत आहे.

<u>अटी व शर्ती :</u>

१. विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील बेरोजगार युवक-युवतींना मोटार वाहन चालकाचे प्रशिक्षण देण्याची जबाबदारी आमच्या संस्थेवर दिलेली असून योजनेच्या अटी व शर्ती लिहून देणार यांना मान्य आहे.
२. कार्यारंभ आदेश प्राप्त होताच प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण देण्याची कार्यवाही करण्यात येईल, हे लिहून देणार यांना मान्य आहे.

३. कार्यारंभ आदेश मिळाल्यानंतर व करारनामा झाल्यानंतर योजनेच्या प्रशिक्षण कार्यक्रम सुरु करणे आवश्यक राहील, अन्यथा दंडाची रक्कम प्रतिमहा रुपये १०,०००/- या प्रमाणे आकारण्यात येईल, हे लिहून देणार यांना मान्य आहे.

४. योजनेच्या सर्व अटी व शर्ती मान्य असून सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण(संबंधीत) यांचेकडून यादी प्राप्त होताच प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण देण्याची कार्यवाही सुरु करणे, लिहून देणार यांना मान्य आहे.

५. प्रशिक्षणार्थींची वैद्यकीय तपासणी निर्देशित प्राधिकाऱ्याकडूनच करुन घेणे, वाहन चालविण्याचे कच्चे व पक्के परवाने (Licence)प्राप्त करुन देणे, ३० दिवसांचे मोटार वाहन चालकाचे प्रशिक्षण देण्याची जबाबदारी संस्थेची राहील, हे लिहून देणार यांना मान्य आहे.

६. प्रशिक्षणार्थींची हजेरी ठेवणे संस्थेवर बंधनकारक राहील, तसेच प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण दिल्यानंतर यशस्वी प्रशिक्षणार्थ्यांची यादी, परवाना क्रमांक व दिनांक यांची अद्ययावत यादी सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण (संबंधीत) व संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, पुणे यांना सादर करणे बंधनकारक राहील, हे लिहून देणार यांना मान्य आहे.

७. प्रशिक्षण कार्यक्रम सुरु करण्यासाठी कोणतेही अग्रीम देण्यात येणार नाही, तसेच प्रशिक्षण सत्र संपल्यानंतर लाभार्थ्यांची यादी, परवाना प्रत इत्यादी बाबींची पुर्तता सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांचेकडे केल्यानंतर कार्यारंभ आदेशातील अटी व शर्तीनुसार देयके अदा करण्यात येतील, हे लिहून देणार यांना मान्य आहे.

८. कार्यारंभ आदेशाच्या अनुषंगाने वाहन चालक प्रशिक्षण संस्था व शासन यांच्यामध्ये काही वाद निर्माण झाल्यास "आरबीट्रेशन ॲन्ड कॉन्सीलेशन ॲक्ट १९९६" नुसार प्रकरण/वाद लवादाकडे निर्णयार्थ पाठविले जाईल. आणि याबाबत लवादाने दिलेला निकाल हा अंतिम व बंधनकारक राहील, हे लिहून देणार यांना मान्य आहे.

९. शासन, संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे / प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, / सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण अथवा त्यांचे प्रतिनिधी प्रशिक्षण कार्यक्रमाची अचानक तपासणी करतील, त्यावेळेस प्रशिक्षणातील त्रूटी निदर्शनास आणू शकतात, अशा त्रूटी निदर्शनास आल्यास संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे हे त्याबाबत योग्य वाटेल त्या दराने दंड सुनिश्चित करतील, सदर दंड देय असणाऱ्या देयकातून कपात करण्यात येईल, हे लिहून देणार यांना मान्य आहे.

१०. कोणतेही कारण न देता, प्रशिक्षण बंद करणे, प्रशिक्षणाचे कार्यारंभ आदेश रद्द करणे याबाबतचे सर्व अधिकार संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना राहतील, हे लिहून देणार यांना मान्य आहे.

११. देयक अदा करताना नियमानुसार आयकर व इतर संविधानिक कर कपात करण्यात येईल, हे लिहून देणार यांना मान्य आहे.

१२. कार्यारंभ आदेशात नमूद केल्याप्रमाणे प्रती प्रशिक्षणार्थी रक्कम रुपये --------------/- व्यतिरिक्त कोणत्याही प्रकारच्या रक्कमेची मागणी करता येणार नाही किंवा त्यासाठी न्यायालयात दाद मागता येणार नाही, हे लिहून देणार यांना मान्य आहे.

१३. मोटार वाहन चालक प्रशिक्षणासाठी लिहून देणार यांचे संस्थेची निवड झालेली असून त्यापोटी रु.५.०० लक्ष सुरक्षा ठेव रक्कम विभागाकडे जमा करणे बंधनकारक असून प्रशिक्षण सुरु करण्यापूर्वी सदरची रक्कम रेखांकीत डिमांड ड्राफ्ट /बँक गॅरंटीव्दारे लिहून घेणार यांचेकडे जमा करणे बंधनकारक राहील. प्रशिक्षण कालावधी पूर्ण झाल्यानंतर/ यशस्वी केल्यानंतर सदरची अनामत रक्कम लिहून घेणार हे लिहून देणार यांना परत करतील, हे लिहून देणार यांना मान्य आहे. सदरील अट शासकीय संस्थांना लागू राहणार नाही.

वरील करारनाम्यात नमुद करण्यात आलेले सर्व अटी व शर्ती, तसेच कार्यारंभ आदेश मी वाचलेले असून करारनाम्यात नमुद करण्यात आलेल्या सर्व अटी व शर्ती मला मान्य असून स्वखुशीने मी हा करारनामा कोणतेही नशापान न करता, कोणाच्याही दबावाखाली न येता, आज दि. .............. रोजी----------या ठिकाणी लिहून देत आहे.

ठिकाण : ---------

दिनांक : / /

श्री.----------------------
----------------------
----------------------
(लिहून देणार)

(श्री.------------------)
संचालक,
**विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण,**
**महाराष्ट्र राज्य, पुणे**
(लिहून घेणार)

साक्षीदार

१) ----------------------------------
----------------------------------

२) ----------------------------------
----------------------------------

**(शासन निर्णय विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग क्रमांक मोवाप्र-२०१८/प्र.क्र.९३/विजाभज-१, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८ चे सहपत्र)**

## विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील बेरोजगार युवक-युवतींना मोटार वाहन चालक प्रशिक्षण योजना

---

## परिशिष्ट-इ

### प्रशिक्षणासाठी निवड झालेल्या प्रशिक्षणार्थीकडून घ्यावयाचे बंधपत्र नमुना

(रु.१००/- **चे स्टॅम्प पेपरवर)**

मी श्री/श्रीमती/कुमारी---------------------------------------वय वर्षे----------------- मु.पो.-- -------------तालुका-----------------शहर------------------जिल्हा---------------- सत्य प्रतिज्ञेवर बंधपत्र लिहून देतो / देते की, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभागामार्फत घेण्यात येणाऱ्या " विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील बेरोजगार युवक-युवतींसाठी मोटार वाहन चालक प्रशिक्षण " या योजनेंतर्गत वाहन चालक प्रशिक्षणासाठी मी अर्ज केलेला होता. त्यानुसार सदरचे प्रशिक्षणासाठी माझी निवड करण्यात आलेली असून खालील अटी व शर्ती मला मान्य असल्याबाबत बंधपत्र करुन देत आहे.

१) प्रशिक्षणासाठी माझी निवड झालेली असून अटी व शर्तीमध्ये नमूद केल्याप्रमाणे मी सध्या बेरोजगार असून कोणत्याही शासकीय / खाजगी कार्यालये पूर्णवेळ नोकरी करत नाही.

२) जड मोटार वाहन चालक प्रशिक्षणासाठी आवश्यक ती अर्हता माझ्याकडे आहे.

३) सदरचे प्रशिक्षणाचा कालावधी हा जास्तीत जास्त ३० दिवसांचा असल्याचे मला ज्ञान असून सदरचे कालावधीत मी प्रशिक्षणासाठी गैरहजर राहणार नाही अथवा मध्येच प्रशिक्षण सोडून जाणार नाही, हे मला मान्य आहे. तसेच प्रशिक्षण मध्येच सोडून गेल्यास संपूर्ण प्रशिक्षण कालावधीचा खर्च माझ्याकडून वसूलपात्र राहील.

४) प्रशिक्षण पूर्ण केल्यानंतर मी स्वयंरोजगार सुरु केल्यास अथवा शासकीय, निमशासकीय व खाजगी संस्थेमध्ये मला नोकरी मिळाल्यास त्याची माहिती संबंधीत सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांना देणे माझ्यावर बंधनकारक राहील.

वरील प्रमाणे अटी व शर्ती मला मान्य असल्याने सदरचे बंधपत्र मी स्वखुशीने लिहून देत असून बंधपत्रातील अटी व शर्तीचे गांभीर्य मला ज्ञात आहे.

दिनांक : / /२०

ठिकाण : ----------------

सही :-------------------------------

नांव :------------------------------

पत्ता :------------------------------

------------------------------------

भ्रमणध्वनी क्रमांक-----------------

सहाय्यक आयुक्त,

समाज कल्याण----------------

**(शासन निर्णय विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग क्रमांक मोवाप्र-२०१८/प्र.क्र.९३/विजाभज-१, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८ चे सहपत्र)**

## मोटार वाहन चालक प्रशिक्षण योजना
## ई-निविदा प्रक्रियेबाबत कागदपत्रांचा तपशिल व कार्यपध्दती

### प्रपत्र -अ
### (निविदेच्या अटी व शर्ती)
### (निविदाधारकाने मान्य असल्याबाबत स्वाक्षरीत करुन तांत्रिक लिफाफ्यामध्ये अपलोड करावेत.)

१. ई-निविदा भरतेवेळी जाहिरातीत नमूद केल्याप्रमाणे तांत्रिक अर्हता पूर्ण करत असल्याची खात्री केल्यानंतरच निविदाधारकांनी ई-निविदा अर्ज भरावा.

२. ई-निविदा स्विकारण्याचा अंतिम दिनांक / / रोजी दुपारी३.०० वा. पर्यंत राहील.

३. ई-निविदा भरतेवेळी जाहिरातीत नमूद केल्याप्रमाणे ई-निविदा बयाणा रक्कम Online स्वरुपात जमा करणे किंवा राष्ट्रीयकृत बँकेचे गॅरंटीपत्र संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे येथे देय असलेला असावा. गॅरंटीपत्र राष्ट्रीयकृत बँकेचे असणे अनिवार्य आहे.

४. ई-निविदा उघडताना प्रथम लिफाफा क्र. १ (तांत्रिक लिफाफा) उघडण्यात येईल. लिफाफा क्र.१ मधील आवश्यक ती सर्व कागदपत्रे पूर्ण असतील तरच (व्यापारी दराचा लिफाफा) लिफाफा क्र.२ उघडण्यात येईल. लिफाफा क्र.१ अपूर्ण असल्यास लिफाफा क्र.२ उघडण्यात येणार नाही.

५. ई-निविदापूर्व बैठक (प्रि.बीड) दिनांक / /२० रोजी संबंधित संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचे कार्यालयात घेण्यात येईल.

६. प्राप्त ई-निविदेतील लिफाफा क्र.१ तांत्रिक लिफाफा या कार्यालयातील खरेदी समिती समोर ई-निविदाधारक / ई-निविदाधारकाचे प्राधिकृत प्रतिनिधी यांच्या समक्ष दिनांक / /२० रोजी सकाळी .०० वा. उघडण्यात येतील. यावेळी सर्व निविदाधारकांनी निविदे सोबत जोडलेल्या मुळ कागदपत्रांसह उपस्थित रहावे. काही अपरिहार्य कारणास्तव दिनांक व वेळेत बदल झाल्यास त्याबाबत या कार्यालयाचे सुचना फलकावर सूचना लावण्यात येईल किंवा ई-मेलव्दारे कळविण्यात येईल.

७. निविदेच्या कोणत्याही स्तरावर निविदेबाबत वाद निर्माण झाल्यास त्याबाबत अंतिम निर्णय घेण्याचे सर्व अधिकार संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांना राहतील.

८. दरपत्रकामध्ये (Price Bid) खाडाखोड/ संदिग्धता असल्यास सदर दर ग्राह्य धरले जाणार नाही. तसेच अंकी व अक्षरी दरामध्ये तफावत असल्यास अक्षरी नमूद केलेले दर अंतिमरित्या ग्राह्य धरले जातील.

९. ई-निविदा मंजूर झाल्यास नियमानुसार देय असलेले मुद्रांक शुल्क भरुन करारनामा करुन द्यावा लागेल.

१०. ई-निविदा मंजूर केल्याच्या दिनांकापासून १५दिवसांच्या आत प्रशिक्षण केंद्र सुरु करावे लागेल.

११. मुदतीत प्राप्त न झालेली ई-निविदा किंवा अपूर्ण कागदपत्रे असलेली ई-निविदा ग्राह्य धरली जाणार नाही.

१२. ज्या संस्थेच्या नावे ई-निविदा फॉर्म खरेदी केला असेल त्याच संस्थेने ई-निविदा फॉर्म भरणे बंधनकारक आहे. ई-निविदा फॉर्म खरेदीवर व प्रत्यक्ष ई-निविदा भरणा-या संस्थेच्या नावात फरक असल्याचे निदर्शनास आल्यास ई-निविदा फॉर्म बाद करण्यात येइल.

१३. व्यवसाय नोंदणी प्रमाणपत्र / संस्था नोंदणी प्रमाणपत्र अद्यावत असणे आवश्यक आहे. त्याच प्रमाणे उपरोक्त प्रमाणपत्र मंजूर प्रशिक्षण कालावधीपर्यंत अद्यावत असणे आवश्यक आहे.

१४. आयकर नोंदणी प्रमाणपत्र (पॅनकार्ड) निविदे सोबत जोडणे आवश्यक आहे.लागू असल्यास जी.एस.टी. प्रमाणपत्र जोडावे.

१५. निविदाधारकाने यापूर्वी सरकारी संस्थेत अशा प्रकारचे काम केले असल्याबाबतचे संबंधित संस्था प्रमुखाचा

अनुभवाचा दाखला असल्यास सोबत जोडावा.

१६. बयाणा / अनामत रक्कम यावर कोणत्याही प्रकारचे व्याज मिळणार नाही. निवीदेत सहभागी निवीदाधारकाने निवीदा प्रक्रीयेमध्ये कोणत्याही स्तरावर निवीदेतून माघार घेतल्यास त्याची बयाणा रक्कम जप्त करण्यात येईल.

१७. सदर ई-निविदेसाठी बयाना रक्कम (Earnest Money Deposit)(EMD) म्हणून रु.५.०० लक्षचे राष्ट्रीयकृत बँकेचे धनाकर्ष जोडणे आवश्यक आहे. धनाकर्ष संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांच्या नावाने काढावे.

१८. यशस्वी (मंजूर) निविदाधारकांच्या बाबतीत रु.५.०० लक्ष सुरक्षा अनामत रक्कम म्हणून राष्ट्रीयकृत बँकेतील कराराच्या कालावधीत वैध राहणा-या बँकेची **हमी (बँक गॅरंटी)** किंवा धनाकर्ष (Demand Draft) संचालक,विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय,पुणे यांचेकडे जमा करणे बंधनकारक राहील.

१९. मंजूर केलेले दर हे आदेशाच्या दिवसांपासून २ वर्ष संपेपर्यंत अंमलात राहतील.

२०. ई-निविदाधारकाच्या बिलातून नियमाप्रमाणे आयकराची ,इतर कराची रक्कम कपात करण्यात येईल.

२१. विभागातील विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील युवकांना वाहनचालक व वाहक प्रशिक्षण केंद्र केव्हाही बंद करण्याचा अधिकार संचालक, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांना अथवा शासनाने प्राधिकृत केलेल्या प्राधिकारी यांनी राखून ठेवलेला आहे.

२२. सदर निविदेस अंतिम मान्यता देणे ही बाब शासनाचे अंतिम मान्यतेच्या अधीन राहील.

२३. ई-निविदा कोणतेही कारण न देता नाकारण्याचा अथवा रद्द करण्याचा अधिकार संचालक, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांनी राखून ठेवला आहे.

२४. ई-निविदाधारकाच्या स्वत:च्या मालकीचे किंवा प्रशिक्षण संस्थेच्या नावे किमान ५ वाहने प्रति प्रशिक्षण केंद्र (हलके व अवजड मिळून) असणे आवश्यक आहेत. वाहन मालकी बाबत प्रादेशिक परिवहन अधिकारी यांचे दाखले सत्यप्रत साक्षांकित केलेले असावेत.

२५. केंद्र / राज्य शासकीय किंवा निमशासकीय कार्यालयाच्या ड्रायव्हिंग प्रशिक्षण देण्याबाबतचा ५ वर्षाचा अनुभव ज्या संस्थेच्या नावे ई-निविदा भरत आहेत त्या संस्थेच्या नावाने असणे आवश्यक आहे.

२६. निविदा उघडण्याच्या तारखेत व वेळेत बदल करण्याचे अधिकार संचालक, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांना राहतील.

२७. संपूर्ण ई-निविदा कोणतेही कारण न देता स्विकृत अथवा अस्विकृत करण्याचा अधिकार संचालक, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचेकडे राखून ठेवण्यात आलेला आहे.

२८. इसारा रक्कम स्विकारण्याच्या अंतिम तारीख व वेळेनंतर प्राप्त झालेली इसारा रक्कम स्विकारण्यात येणार नाही व निविदा स्विकारण्यात येणार नाही.

२९. निविदा भरत असलेल्या संस्थेस व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांची मान्यता असणे आवश्यकआहे.

३०. ई-निविदा भरताना मागविण्यात येणाऱ्या हलके/ अवजड मोटार वाहनचालक व वाहक इत्यादी सर्व प्रशिक्षणाचे दर भरणे संस्थेवर बंधनकारक आहे. केवळ विशिष्ट प्रकारच्या प्रशिक्षण वर्गाकरीता दर भरणाऱ्या निविदाधारकास अपात्र ठरविण्यात येईल.

३१. हलके /अवजड वाहनचालकाच्या प्रशिक्षणाचा कालावधी ३० दिवसांचा राहील.

३२. निविदेमध्ये सर्व अटी व शर्तीची पूर्तता अनेक संस्था करीत असल्यास त्या सर्व संस्थांना सम प्रमाणात काम विभागून देण्यात येईल.

३३. ई-निविदा भरत असलेल्या संस्थेस शासनाच्या परिवहन विभागाची मान्यता असणे आवश्यक आहे.

३४. प्रशिक्षणार्थीचे प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर त्यांचे परवाने (लायसेन्स) संबंधीत जिल्हा कार्यालयात सादर करण्यात आल्यानंतर जिल्हा कार्यालयाकडून संचालक, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांना अहवाल प्राप्त झाल्यानंतर निधी उपलब्धतेनुसार एका महिन्यात मंजूर केलेली प्रशिक्षण फी नियमानुसार संबंधित सहायक आयुक्त, समाज कल्याण यांचेकडून अदा करण्यात येईल. (संबंधीत प्रशिक्षण देणा-या संस्थेची प्रशिक्षणासाठीची

रक्कम अदा करतांना प्रशिक्षणार्थींना अनुज्ञेय असणा-या विद्यावेतनाची रक्कम संबंधित अर्जदार यांचे खात्यावर परस्परवर्ग करण्यात येईल व उर्वरीत संस्थेस देय असणारी रक्कम नियमांनुसार अदा करण्यात येईल, याकरीता कोणत्याही प्रकारचे अग्रीम शासन वा दुय्यम कार्यालयाकडून देण्यात येणार नाही.)

३५. निविदा भरत असलेल्या संस्थेस एकापेक्षा जास्त विभागात निविदा भरावयाची असल्यास त्या विभागनिहाय बयाणा रक्कम ऑन लाईन (Online ) किंवा राष्ट्रीयकृत बँकेचे धनाकर्ष (डिमांड ड्राप-ट) आवश्यक.

३६. प्रशिक्षण कालावधीत प्रशिक्षणार्थींचे हजेरी ठेवून त्यावर नियमित प्रशिक्षणार्थींची हजेरी घेण्याची जबाबदारी संस्थेची राहील.

३७. संस्थेची आर्थिक परिस्थिती तपासण्याकरीता निविदा भरत असलेल्या संस्थेची त्यापूर्वीच्या वर्षाची कमीतकमी रु.५०.०० लाख (अक्षरी रु. पन्नास लाख फक्त ) ची उलाढाल असणे आवश्यक आहे. त्याकरीता अर्जदार प्रशिक्षण संस्थेच्या मागील तीन वर्षाचे वार्षिक अहवाल व सनदी लेखापालाने प्रमाणीत करुन स्वाक्षरी केलेले नफा/तोटापत्र व ताळेबंद तसेच आयकर परताव्याच्या प्रमाणपत्राची प्रत सोबत जोडावी.

३८. या अटी व शर्ती व्यतीरिक्त शासनाने वेळोवेळी घातलेल्या अटी व शर्ती प्राधिकृत केलेल्या प्रशिक्षण संस्थेवर बंधनकारक राहतील.

३९. निवड झालेल्या संस्थांना शासन ठरवून देईल अशा अटी व शर्तींचा करारनामा करुन द्यावा लागेल हा करारनामा संचालक, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचेशी करावा लागेल.

**दिनांक: / /२०** **निविदाधारकाची स्वाक्षरी व शिक्का**

**स्थळ:-** **निविदाधारकाचे नांव**

**संस्था/फर्म नांव व पूर्ण पत्ता**

**(शासन निर्णय विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग क्रमांक मोवाप्र-२०१८/प्र.क्र.९३/विजाभज-१, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८ चे सहपत्र)**

**प्रपत्र-ब**

**(अपलोड करण्यासाठी)**

**राज्यातील विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील युवक-युवतींना वाहन चालक व वाहक प्रशिक्षण देण्यासाठी निविदा अर्ज**

१) ड्रायव्हिंग प्रशिक्षण संस्थेच्या मालकाचे संपूर्ण नांव : ------------------------------

२) ड्रायव्हिंग प्रशिक्षण संस्थेचे संपूर्ण नांव : ------------------------------

३) संस्थेचा मुख्य कार्यालयाचा संपूर्ण पत्ता : -------------------------------
(जवळच्या खुणेसह) : ------------------------------
- ----------------------------

४) प्रादेशिक परिवहन अधिकारी यांनी दिलेल्या :
मान्यतेचे अनुज्ञप्ती ---------क्रमांक ------- मुदत - दर्जा ------

५) संस्थेचा नोंदणी क्रमांक : ------------------------------

६) दूरध्वनी व फॅक्स क्रमांक : ------------------------------
मोबाईल क्रमांक
------------------------------

**संस्थेच्या अन्य जिल्ह्यातील शाखांचा तपशिल**

१) ड्रायव्हिंग प्रशिक्षण संस्थेच्या मालकाचे संपूर्ण नांव : ------------------------------

२) ड्रायव्हिंग प्रशिक्षण संस्थेचे शाखेचे संपूर्ण नांव : ------------------------------

३) संस्थेचा दुसऱ्या जिल्ह्यातील कार्यालयाचा संपूर्ण पत्ता : -----------------------------
------------------------------

४) प्रादेशिक परिवहन अधिकारी यांनी दिलेल्या मान्यतेचे अनुज्ञप्ती : ---------क्रमांक ------- मुदत - दर्जा -----------

५) संस्थेचा नोंदणी क्रमांक : ------------------------------

६) दूरध्वनी व फॅक्स क्रमांक : ------------------------------
मोबाईल क्रमांक ------------------------------

**दिनांक:** **निविदाधारकाची सही व शिक्का**

(टिप - अन्य प्रत्येक जिल्ह्यातील प्रशिक्षण केंद्राच्या शाखेचा तपशिल स्वतंत्रपणे वरील नमून्यात शाखा निहाय वेगळा लिफाफा १ (तांत्रिक लिफाफा) मध्येच जोडून सादर करावा.)

**(शासन निर्णय विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग क्रमांक मोवाप्र-२०१८/प्र.क्र.९३/विजाभज-१, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८ चे सहपत्र)**

**प्रपत्र-क**

**महाराष्ट्र शासन**
**विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग**
**(संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे)**

**ई-निविदा सुचना क्रमांक ---------**
**(प्रादेशिक विभाग नांव ------------)**
**लिफाफा क्र. 2 मध्ये टाकावयाचा फॉर्म (व्यापारी लिफाफा)**

मी / आम्ही ड्रायव्हिंग प्रशिक्षण संस्थेद्वारे प्रशिक्षण योजनेअंतर्गत राज्यातील विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभागाच्या प्रादेशिक विभाग-------अंतर्गत येणाऱ्या सर्व कार्यालयामार्फत येणाऱ्या युवक-युवतींना हलके / अवजड वाहनचालक व वाहकाचे प्रशिक्षण देण्याकरीता दि. / / ते दि. / / पर्यंतच्या कालावधीसाठी खालील नमूद केलेल्या वर्गासाठी व त्याच्या समोर नमूद केलेल्या प्रशिक्षणाचा कालावधीनुसार प्रशिक्षण देण्यास तयार आहोत. खालील दिलेल्या प्रशिक्षण प्रकार निहाय दरामध्ये प्रशिक्षण कालावधीतील प्रशिक्षण खर्च,कच्चे व पक्के लायसेन्सचा खर्च, हलके व अवजड प्रशिक्षणाचा व वाहकाच्या लायसन्स बिल्ल्याचा इत्यादी तसेच स्थानिक प्रशिक्षणर्थीना शासनाने ठरवून दिलेले प्रतिप्रशिक्षणार्थी विद्यावेतन इत्यादी खर्चाचा समावेश राहील.

खालील दिलेल्या तक्त्यामध्ये प्रशिक्षण निहाय दर भरुन स्वाक्षरी करण्यात यावी.

| **अ.क्र.** | **प्रशिक्षणाचा प्रकार** | **प्रशिक्षण कालावधी** | **प्रशिक्षणाचे दर (अनिवासी)** | **निविदाधारकाची सही** |
|---|---|---|---|---|
| १) | हलके मोटार वाहन चालक प्रशिक्षण | ३०दिवस | | |
| २) | अवजड मोटार वाहन चालक प्रशिक्षण ( ट्रान्स्पोर्ट व बॅचसह) | ३०दिवस | | |

प्रस्तुत निविदा अर्जापोटी शासनाच्या विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांच्या अंतर्गत येणाऱ्या प्रादेशिक विभाग कार्यालयाच्या कार्यक्षेत्रातील जिल्हयामधील प्रशिक्षणार्थीना प्रशिक्षण देण्यासाठी इसारा रक्कम रु.५,००,०००/- (अक्षरी रु. पाच लाख फक्त) राष्ट्रीयकृत बॅक / शेडयुल्ड बँकेत Online भरल्याचे कागदपत्रे किंवा गॅरंटीपत्र संबंधित लेखाधिकारी, संचालक, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे येथे जमा केला आहे.

सोबत जोडलेल्या नियमावली व अटी-शर्ती अर्ज करण्यापूर्वी मी/आम्ही काळजीपूर्वक वाचल्या असून स्वाक्षरी केलेली आहे. त्यात नमूद अटी व शर्ती माझ्या/आमच्या मुदत संपेपर्यंत माझ्यावर/आमच्यावर बंधनकारक राहतील व त्या सर्व आम्हांस मान्य आहे.

**दिनांक:** **निविदाधारकाची सही व शिक्का**
**स्थळ :** **निविदाधारकाचे संपूर्ण नाव**
**फर्मचे नाव व पत्ता**

**(शासन निर्णय विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग क्रमांक मोवाप्र-२०१८/प्र.क्र.९३/विजाभज-१, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८ चे सहपत्र)**

**प्रमाणपत्र (ड)**

**(रक्कम रुपये १००/-चे स्टँप पेपरवर)**

मी-------------------------------------------यावरुन असे प्रतिज्ञापत्र देतो की, या अर्जात नमूद करण्यात आलेल्या ई-निविदा फॉर्म **अ** व **ब** मधील माहिती, अटी, शर्ती व वैयक्तिक माहिती मी पुर्णपणे वाचून समजून घेतली असून ती बरोबर असून ती मला मान्य आहेत. तसेच काही अपरिहार्य कारणामुळे देयकाची रक्कम अदा करण्यास उशीर झाल्यास सदर रक्कमेवर व्याज दिले जाणार नाही, याची मला / आम्हाला जाणीव आहे, पुर्णकल्पना आहे व त्यामला / आम्हाला मान्य आहे. तसेच ई-निविदेमध्ये दिलेली माहिती चौकशीअंती खोटी असल्याचे आढळून आल्यास माझ्यावर / आमच्यावर शासनाच्या नियमानुसार उचित कारवाई करण्यात येईल, याची मला/आम्हाला जाणीव आहे.

**दिनांक:-**

**स्थळ** :-

**निविदाधारकाची स्वाक्षरी व शिक्का**
**निविदाधारकाचे नाव**
**संस्था / फर्मचे नाव व पूर्ण पत्ता**

(शासन निर्णय विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग क्रमांक मोवाप्र-२०१८/प्र.क्र.९३/विजाभज-१, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८ चे सहपत्र)

## प्रपत्र - इ

**महाराष्ट्र शासन**
**विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग**
**(संचालक, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे)**
**ई-निविदा सुचना क्रमांक**

महाराष्ट्र शासनाच्या विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभागाच्या वतीने संचालक, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे हे -----------विभागातील विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील युवक-युवतींना वाहनचालक व वाहक प्रशिक्षण देणेसाठी दोन लिफाफा पध्दतीने ई-निविदा मागविण्यात येत आहे.

| अ.क्र | तपशिल | प्रशिक्षणार्थी संख्या | ई-निविदा फॉर्म किंमत | बयाणा रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | .................प्रादेशिक विभागातील विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील युवक-युवतींना वाहन चालक व वाहक प्रशिक्षण केंद्र | ---- | रु.१०,०००/- | रु.५,००,०००/- |

१) **संपूर्ण निविदा प्रक्रिया** ही ई-निविदाव्दारे होणार असून, निविदा सूचना, अटी व शर्ती, शुध्दीपत्रक इत्यादी माहिती http://maharashtra.etenders.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

२) **ई-निविदासाठी** ठेकेदाराकडे डिजिटल सिग्नेचर सर्टिफिकेट (DSC)असणे आवश्यक आहे व निविदा संकेतस्थळावर रजिस्टर होणे आवश्यक आहे. यासाठी निविदाधारकांनी रक्कम रु.---------/- नेक्स्ट टेंडर या कंपनीला ऑनलाईन भरावे लागतील.

३) **ई-निविदा** फॉर्म सुरु होण्याचा कालावधी (download) दिनांक / / पासून दिनांक / / पर्यंत दुपारी .०० वा. पर्यंत राहील.

४) **ई-निविदा** पूर्व बैठक (प्रि.बीड) दिनांक / /२० दुपारी .००वा.

५) **ऑनलाईन** निविदा भरणे (upload) दिनांक / / २० रोजी सकाळी .०० वा. पासून दिनांक / / दुपारी .०० वा.

६) **ऑनलाईन** निविदेचा तांत्रिक लिफाफा उघडण्याचा दिनांक / /२० सकाळी .००वा.

७) **निविदा** शुल्काचे Online रक्कम भरल्याचे अथवा (राष्ट्रीयकृत बँकेचे) बँक गॅरंटी पत्र, दिनांक / / दुपारी .०० वा. पर्यंत लेखाधिकारी, संचालक, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे येथे जमा करावेत.

८) **बयाणा** रक्कम (EMD) Online रक्कम भरल्याचे अथवा (राष्ट्रीयकृत बँकेचे) बँक गॅरंटीपत्र दिनांक / / दुपारी .०० वा. पर्यंत लेखाधिकारी, संचालक, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे येथे जमा करावेत.

९) **ई-निविदा** सादर करण्याच्या अटी व शर्ती ई-निविदा फॉर्म सोबत जोडण्यात आलेल्या आहेत.

१०) **प्राप्त** ई-निविदेतील लिफाफा क्र.१ तांत्रिक लिफाफा या कार्यालयातील खरेदी समिती समोर ई-निविदाधारक/ई-निविदाधारकाचे प्राधिकृत प्रतिनिधी यांच्या समक्ष दिनांक / / रोजी दुपारी .०० वा. उघडण्यात येतील. यावेळी सर्व निविदाधारकांनी निविदे सोबत जोडलेल्या मूळ कागदपत्रांसह उपस्थित रहावे. काही अपरिहार्य कारणास्तव दिनांक व वेळेत बदल झाल्यास त्याबाबत या कार्यालयाचे सुचना फलकावर सुचना लावण्यात येईल किंवा ई-मेलव्दारे कळविण्यात येईल.

११) **प्राप्त** झालेल्या ई-निविदा स्विकारणे अथवा कोणतेही कारण न देता नाकारण्याचे अधिकार संचालक, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांनी राखून ठेवलाआहे.

**दिनांक / /२०**
**ठिकाण -**

**संचालक,**
**विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय,**
**पुणे**

**( शासन निर्णय विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग क्रमांक मोवाप्र-२०१८/प्र.क्र.९३/विजाभज-१, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८ चे सहपत्र)**

## प्रपत्र-ई

<u>तांत्रिक लिफाफ्यासाठी आवश्यक कागदपत्रे- (upload) करावयाची कागदपत्रे</u>

१. निविदा फी रक्कम रुपये १०,०००/- (Non Refundable) व बयाणा रक्कम रुपये ५,००,०००/- (अक्षरी रु. पाच लाख फक्त) Online रक्कम भरुन त्याची पावती (Receipt) अथवा (राष्ट्रीयकृत बँकेचे) बँक गॅरंटी पत्र (upload) करावा अथवा बयाणा रक्कमेपासून सूट असल्यास त्याबाबतचे सक्षम प्राधिकाऱ्याचे प्रमाणपत्र. सदरचे राष्ट्रीयकृत बँकेतील बँक गॅरंटीची मुळ प्रत संचालक, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचेकडे जमा करावी लागेल.

२. व्यवसाय नोंदणी प्रमाणपत्र / संस्था नोंदणी प्रमाणपत्र

३. प्रादेशिक परिवहन कार्यालयाचे अधिकृत मोटार वाहन प्रशिक्षण संस्था म्हणून प्रमाणपत्र.

४. संस्थेचे पॅनकार्ड.

५. संस्था चालकाचा वर्तणूकीचा व पूर्व चारित्र्य पडताळणीचा पोलीस अधिक्षक / पोलीस आयुक्त यांच्या दाखल्याची प्रत.

६. एका वर्षात रुपये ५०.०० लाख (रुपये पन्नास लाख फक्त) उलाढाल असलेले लगतच्या मागील तीन वर्षाचे सनदी लेखापालाने प्रमाणित करुन स्वाक्षरी केलेले नफा/तोटा ताळेबंद पत्र.

७. जिल्हानिहाय निविदाधारकांच्या स्वत:च्या किंवा प्रशिक्षण संस्थेच्या नावे किमान ५ (हलके/ अवजड) वाहनाचे कागदपत्र प्रादेशिक परिवहन अधिकारी यांचे दाखल्यासह.

८. सदर ई-निविदेसाठी रक्कम रु. ५.०० लक्ष चे राष्ट्रीयकृत बँकेचे धनाकर्ष प्रमाणपत्र.

९. केंद्र / राज्य शासकीय किंवा निमशासकीय कार्यालयाच्या ड्रायव्हिंग प्रशिक्षण देण्याबाबतचा ५ वर्षाचा अनुभवाचा पुरावा.

१०. निविदाधारक फर्म अथवा कंपनी, भागीदारी संस्था इत्यादी स्वरुपात असल्यास निविदा भरण्यासाठी प्राधिकृत केलेल्या संबंधीत व्यक्तीच्या नावाने मुखत्यारपत्र (Power of Attorney) (लागूअसल्यास)

११. लगतच्या वर्षाअखेर व्यवसायकर, सेवा कर, आयकर इ. भरणा केल्याची पावती/निपटारा प्रमाणपत्र.

१२. निविदेतील अटी व शर्ती (प्रपत्र-अ), प्रपत्र-ब आणि प्रमाणपत्र-ड निविदाधारकाने सही व शिक्क्यासह स्वाक्षरीत करुन त्याची प्रत upload करावी.

१३. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची मान्यतेची प्रत.

(उपरोक्त अ.क्र. १ ते १३ मधील कागदपत्रे अनिवार्य आहेत. अन्यथा तांत्रिक लिफाफा नाकारण्यात येईल.)

----